जिल्हा वार्षिक योजनेच्या (सर्वसाधारण)
एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमाबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांकः एमएलके-२०२१/प्र.क्र.२५६ /पदुम-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २७जुलै,२०२२

**वाचा :** १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. एमएलके-२०१०/प्र.क्र.४१३/ पदुम-८, दि.२४.९.२०१०
२ ) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय एमएलके-२०१०/प्र.क्र.२२२/ पदुम-८, दि.८.१२.२०११
३) शासन समक्रमांकीत पुरकपत्र दि.२३.१२.२०२३
४) उप आयुक्त, (प्र.व वि.) दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र.आदुवि-६/जिवायो/न.क्र.२१८/भाग-३/२०२३/३१९१, दि.४.७.२०२३
५) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. जिदुविअ / जिवाओ / अहमदनगर /७४४/२०२३, दि.३.७.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकार क्षेत्रामार्फत करण्यात येणा-या दुग्धव्यवसायाला चालना देवून शितसाखळी निर्माण करून सहकारी दूध संघाच्या सभासद सहकारी दूध संस्थांचे बळकटीकरण करण्यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमातंर्गत संगणक सचिव, मिल्को टेस्टर, दूध संकलनाच्या क्षमतेनुसार १००० / २००० लि. क्षमतेचे डिजी.सेट सह बल्क मिल्क कुलर्स खरेदी करण्यासाठी काही मर्यादेपर्यंत (उपकरणाच्या किंमतीच्या ५०% ते ७५% पर्यंत) निधी उपलब्ध करुन देण्याचा निर्णय दिनांक ८.१२.२०११ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच सदर शासन निर्णयात सुधारणा करून दि.२३.१२.२०२२ रोजीच्या पुरकपत्रान्वये काही नवीन घटकांचा समोवश करण्यात आलेला आहे.

राज्यातील वेगवेगळ्या जिल्ह्यातील आढावा बैठकीदरम्यान मा.मंत्री (दुग्धव्यवसाय) यांच्या निदर्शनास आल्यानुसार महिलांच्या अधिकाधिक सक्षमीकरणासाठी व रोजगार निर्मिती करिता एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रम, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) या योजनेअंतर्गत पात्र महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ.(Farmer Producer Company) यांना **बल्क मिल्क कुलर** वाटप केल्यास रोजगार निर्मिती होऊ शकेल. यानुषंगाने योजनंतर्गत अनुषंगिक साहित्य पात्र महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांना वाटप करणे अनुज्ञेय व्हावे, अशी विनंती जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती, अहमदनगर यांनी संदर्भ क्र.५ अन्वये केलेली आहे. यास्तव, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमातंर्गत राज्यातील पात्र महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांना बल्क मिल्क कुलर साठी अनुदान अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमातंर्गत राज्यातील पात्र महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. (Farmer Producer Company) यांना बल्क मिल्क कुलर साठी अनुदान खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून अनुज्ञेय करण्यात येत आहे.

१. लाभार्थी महिला स्वयंसहायता गटांना यांची उमेद योजनेअंतर्गत नोंदणी असणे आवश्यक आहे.
२. सदर अनुदान अनुज्ञेय करतांना दूध संघांच्या संकलनाबाबतच्या दि.८.१२.२०११ रोजीच्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या "अ), ब) व क)" येथील अटी व शर्ती महिला स्वयंसहायता गट व एफ.पी.ओ. यांना लागू राहतील व त्या प्रमाणातच अनुदान देय राहील .
३. महिला स्वयंसहायता गटांची कृषि व दुग्ध पुरक व्यवसाय असे वर्गीकरणामध्ये नोंदणी असणे तसेच दूध पुरवठा किमान तीन वर्षे सलग सहकारी संघास / खाजगी पुरवठादारास असणे आवश्यक आहे.
४. लाभार्थी महिला स्वयंसहायता गट यांचे व्दितीय मुल्यांकन (Second Gradation) प्रमाणपत्र असणे आवश्यक राहील.
५. महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांचेकडे स्वमालकीची/भाडेतत्त्वावर जागा / कार्यालय तसेच आवश्यक साधने (विज, पाणी व प्रशिक्षित मनुष्य बळ) असणे आवश्यक आहे.
६. महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांचेकडे कोणत्याही प्रकारची थकबाकी नसल्याचे सक्षम प्राधिकारी (गट विकास अधिकारी/ कृषि अधिकारी) यांचे प्रमाणपत्र आवश्यक आहे.
७. महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांचे लेखापरिक्षण व आर्थिक स्थिती बाबत सक्षम प्राधिकारी यांनी प्रमाणित केलेले असणे आवश्यक आहे.
८. महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांनी राज्य अथवा केंद्र शासनाच्या योजनांमधुन यापुर्वी उपरोक्त घटकांकरीता लाभ घेतलेला नसावा.
९. महिला स्वयंसहायता गटांना /एफ.पी.ओ. यांनी मागणीबाबत सविस्तर प्रस्ताव (Detail Project Report) जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांचे मार्फत सादर करणे आवश्यक राहील.
१०. सदर प्रस्तावाची क्षेत्रीय स्तरावर सविस्तर छाननी करून, प्रस्ताव आयुक्त, (दुग्धव्यवसाय विकास) यांच्या मान्यतेस्तव सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असू त्याचा संकेतांक २०२३०७२७१८०७५०४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2023.07.27 18:09:27 +05'30'

**( अश्विनी यमगर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री महोदय, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (दुग्धव्यवसाय विकास), यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई

४. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,
५.सर्व विभागीय आयुक्त
६.सर्व जिल्हाधिकारी
७.प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सर्व
८.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सर्व
९.जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११.नियोजन विभाग कार्यासन क्र. १४८१,१४३१ मंत्रालय, मुंबई